A.A. to Renovation of Canal of RajaNalla Irrigation Project, Tal Karjat Dist Raigad

**राजानाला सिंचन समुह प्रकल्प ता.कर्जत, जि. रायगड या प्रकल्पाची कालव्याच्या नुतनीकरण कामास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र. दुरुस्ती-२०१०/(९१७/२०१०)/सिंव्य(कामे)
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ८.३.२०११

पहावे : १) मुख्य अभियंता जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांचे पत्र क्र.२०१०/ धा.क्र.ई-०६/तां-३(३)/८९१५, दि.१४.१२.२०१०
२) कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांचे पत्र क्र.कोपाविम/ता.२/विसु/४९०, दि. २/२/२०११

**प्रस्तावना :**

राजानाला सिंचन प्रकल्प ता.कर्जत,जि.रायगड हा टाटा चे भिवपुरी जलविद्युत केंद्रातून वीज निर्मितीनंतर सोडण्यात येणाऱ्या अवजलावर कार्यान्वीत आहे. राजानाला सिंचन प्रकल्पातील कालव्याची एकूण लांबी ३८.५० किमी. असून प्रकल्पीय सिंचन क्षमता २५४२ हेक्टर इतकी आहे.

सदरहू प्रकल्पाची सिंचन प्रणाली ही ५०-६० वर्षापूर्वीची आहे. या प्रकल्पाचे कालवे डोंगराचे पायथ्याला लागून असल्याने कोकणात होणाऱ्या अतिवृष्टीने डोंगर उतारवरील पाणी भराव फुटून कालव्यात येते व त्यामुळे दरवर्षी मोठया प्रमाणात कालव्यात गाळ साचला जातो तसेच भरावाचे मोठया प्रमाणात नुकसान होते. कालव्यावरील बांधकामे ही दगडी बांधकामात असून सदर बांधकामे क्षतिग्रस्त झालेली असल्याने त्यातून मोठया प्रमाणात पाण्याची गळती होते व कालव्याचे शेवटच्या टोकास कमी क्षमतेने पाणी पुरवठा होतो. वितरिकेची द्वारे सध्या पूर्णपणे गंजलेली असून बांधकामे क्षतिग्रस्त झाले असल्याने देखील मोठया प्रमाणात गळती होते.

या प्रकल्पाच्या विशेष दुरुस्तीनंतर सिंचन क्षेत्र पुनर्स्थापीत होणार आहे. या सर्व बाबींचा विचार करुन राजानाला सिंचन समुह प्रकल्पाच्या कालवा नुतनीकरणाचे दुरुस्तीच्या कामास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

या शासन निर्णयान्वये राजानाला सिंचन समुह प्रकल्पाच्या विशेष दुरुस्तीच्या / विस्तार व सुधारणा रु.५३५९.२० लक्ष (कामाप्रित्यर्थ रु.४८७२.५६ लक्ष व अनुषंगिक खर्च रु.४८६.५४ लक्ष) खर्चाच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून सोबतच्या परिशिष्टाप्रमाणे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१) सदर प्रकल्पास महाराष्ट्र सिंचन पध्दतीचे शेतकऱ्याकडून व्यवस्थापन अधिनियम-२००५ लागू करावा व त्यातील कलम ६ नुसार प्रकल्प अधिसुचित करण्यात यावा. अशी अधिसुचना काढल्यानंतरच प्रस्तावित दुरुस्तीची कामे हाती घेण्यात यावीत.
२) शासन निर्णय क्र. मजसुप्र-१००६/(६८८/०६)लाक्षेवि(कामे), दि.१४.०६.२००७ नुसार लघु वितरिकास्तरीय पाणी वापर संस्थाच्या कार्यक्षेत्रातील हस्तांतरपूर्व / विशेष दुरुस्तीची कामे कंत्राटव्यवस्थापन समिती स्थापन झाल्यानंतरच हाती घेण्यात यावीत.
३) सदर प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व प्रशासकीय मान्यतेच्या तरतुदीच्या मर्यादेत पूर्ण करण्यात यावे.

या योजनेस प्रदान केलेली मुळ प्रशासकीय मान्यता सिं.व्य.(कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र.८ सन २०१०-११ वर नोंदविण्यात आली आहे.

या कामावर होणारा खर्च लेखाशिर्ष ४७०१ भांडवली खर्च, मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्प, ( विस्तार व सुधारणा / विशेष दुरुस्ती) यावरील या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व मंजूर अनुदानातून भागवावा.

हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.६७/व्यय-१२, दि.२४.२.२०११ अन्वये व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ व्यय-१२, दि.५.३.२०११ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय शासनाच्या संकेत स्थळावर (www.maharashtra.gov.in) उपलब्ध करण्यात येत असून त्यांचा संगणक सांकेतांक २०११०३०८१५३४२९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सहपत्र :- परिशिष्ट

( पां. तु. केदारे )
शासनाचे अवर सचिव

प्रत :

महालेखापाल १/२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
महालेखापाल १/२(लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन,मुंबई
मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई
स्वीय सहाय्यक, मा.मंत्री, जलसंपदा (मकृखोविम वगळून), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहाय्यक, मा.राज्यमंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई
मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
स्वीय सहाय्यक, सचिव (जलसंपदा) मंत्रालय, मुंबई
स्वीय सहाय्यक, सचिव (लाक्षेवि) मंत्रालय, मुंबई

कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे,
मु.अ.(पा.) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई
सहसचिव, वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई
सहसचिव, नियोजन विभाग, १४३४ कार्यासन मंत्रालय, मुंबई
आंतरवित्त सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
उपसचिव (सिं.व्य.), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उपसचिव (निवस), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उप सचिव (सिंव्य), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
अधीक्षक अभियंता ठाणे पाटबंध्ारे मंडळ, ठाणे
अवर सचिव, सिं.व्य.(कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यकारी अभियंता, रायगड पाटबंधारे विभाग, कोलाड, (रोहा), जि.रायगड
उप अभियंता (सिंव्य/कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
ग्रंथालय, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
सिंव्य(कामे)/कार्यासन, संग्रहार्थ.

शासन निर्णय क्र. दुरुस्ती-२०१०(९१७/२०१०)/सिंव्य(कामे) दि. ८/३/२०११ चे सहपत्र

**राजानाला सिंचन समुह प्रकल्प ता.कर्जत, जि. रायगड या प्रकल्पाची कालव्याच्या नुतनीकरण कामास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

## परिशिष्ट

| अ.क्र. | शिर्ष/ उपशिर्ष | अंदाजित किंमत (रु. लक्ष) |
|---|---|---|
| | **(II) मुख्य कालवा व शाखा कालवा** | |
| | सी-अस्तरीकरण | १३०५.६२ |
| | डी-विमोचके | २६.०५ |
| | एफ-आरएचटी वर्क्स | २८४.७७ |
| | जी-पूल | २५७.५८ |
| | एल-मातीकाम | २९९८.५४ |
| | **कामाप्रित्यर्थ एकूण खर्च** | **४८७२.५६** |
| | **अनुषंगिक खर्च** | **४८६.६४** |
| | **योजनेचा एकूण खर्च** | **५३५९.२०** |